**शासकीय कामकाजात ई-ऑफीस (E-Office) चा वापर बंधनकारक करणेसंदर्भात सूचना निर्गमित करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**

**शासन परिपत्रक क्रमांक : IELD-15/151/2024-ADMIN-2**

एम-५,पोटमाळा,विस्तारित इमारत,
मंत्रालय, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मुंबई -३२
दिनांक:- २९.५.२०२५

**वाचा-** (१)शासन परिपत्रक, सा.प्र.वि.(मातं.),क्र.मातंस २०२२/प्र.क्र.६२/से-१/३९, दि.२३.२.२०२३
(२) विभागाचे कार्यालयीन आदेश क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.२५/ प्रशासन-२, दि.१३.१२.२०२३
(३) शासन पत्र,सा.प्र.वि.क्र.संकीर्ण-२०२३/प्र.क्र.०२/१८ (र.व.का.), दि.१९.३.२०२४
(४) शासन पत्र समक्रमांक दि.१८.४.२०२४ व दि.७.८.२०२४ व दि.१८.२.२०२५
(५) मुख्य सचिव यांचे पत्र दि.८.१०.२०२४

**प्रस्तावना :-**

शासकीय कामकाजात संगणकाचा अधिकाधिक वापर करून शासकीय कामकाज गतिमान व्हावे, कामकाजात सुसुत्रता यावी, दस्ताऐवज व माहिती सुरक्षित रहावी, निर्णय प्रक्रिया गतिमान व सुलभ व्हावे यासाठी शासकीय कामकाजात दि.१.४.२०२३ पासून ई ऑफीस प्रणालीचा प्रभावी वापर करण्याच्या दृष्टीने संदर्भाधीन क्र. (१) येथील शासन परिपत्रकान्वये सूचना निर्गमित केलेल्या आहेत. त्यानुषंगाने उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागात ई-ऑफीस चा वापर करण्यासाठी वेळोवेळी सूचना देण्यात आलेल्या आहेत. मात्र या विभागात सदर प्रणालीचा वापर होत नसलेचे निदर्शनास आलेने संदर्भाधीन क्र. (२) येथील कार्यालयीन आदेशान्वये दि.१.१.२०२४ पासून या विभागात ई-ऑफीस प्रणालीचा वापर करणे अनिवार्य केलेले आहे.त्यानंतरही ई-ऑफीस चा वापर होत नसलेने संदर्भाधीन क्र.(४) येथील पत्रांन्वये सूचना निर्गमित केलेल्या आहेत. अद्यापही या विभागांतर्गत शासकीय कामकाजात ई-ऑफीस चा प्रभावी वापर होत नसल्याचे निदर्शनास आले आहे.

तसेच "महाराष्ट्र कार्यालयीन कार्यपद्धती-२०२३ च्या मार्गदर्शक सूचनांनुसार सर्व टपाल इलेक्ट्रॉनिक स्वरूपातच तयार व जतन केले जावे.फिजीकल फाईल केवळ अत्यावश्यक परिस्थितीतच तयार केली जावी. प्रशासकीय प्रक्रियेमध्ये पारदर्शकता व कार्यक्षमता आणण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय दि.१२ जुलै,२०२४ अनुसार धोरणात्मक निर्णय घेण्यात आलेला आहे. याशिवाय,नवीन नोंदी तयार करताना महाराष्ट्र कार्यालयीन कार्यपद्धतीचा वापर करावा.सर्व विभागांनी याचे पालन करणे बंधनकारक आहे", अशा प्रकारच्या सूचना मुख्य सचिवांनी संदर्भाधीन क्र.(५) येथील पत्रान्वये दिलेल्या आहेत.तसेच १५० दिवसांच्या कार्यक्रमामध्ये देखील ई-ऑफीसच्या प्रभावी वापराबाबत मुद्दा समाविष्ट केला असून सदर उद्दिष्ट पूर्ण करण्यासाठी गुणांकन (२५ गुण) ठेवण्यात आलेले आहे.

वरील वस्तुस्थिती विचारात घेता तसेच १५० दिवसांच्या कार्यक्रमातील सदर प्रणालीचा १०० टक्के वापराबाबतची कालबद्धता विचारात घेता विभागांतर्गत ई-ऑफीस चा वापर बंधनकारक करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन परिपत्रक-**

(१) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभागात तसेच सदर विभागाच्या अधिनस्त सर्व क्षेत्रीय कार्यालयांमध्ये दि.१.६.२०२५ पासून ई-ऑफीस (E-Office) चा वापर करणे बंधनकारक करण्यात येत आहे.

(२) विभागांतर्गतच्या नस्त्या या ई-फाईल स्वरूपातच असणे आवश्यक असल्याने भौतिक स्वरूपातील नस्त्या (Physical Files) पाठविणे बंद करावे.

(३) आंतर-विभागीय नस्त्या ई-फाईल स्वरूपात स्वीकारणे बंधनकारक केल्याने कोणत्याही भौतिक स्वरूपातील नस्त्या पाठवल्या किंवा स्वीकारल्या जाऊ नयेत.

(४) भौतिक स्वरूपातील नस्त्या स्कॅन करून ई-ऑफिसद्वारे पाठवू नये. ई-फाईल केवळ ग्रीन नोट वापरून आणि विभागाच्या सहसचिव/ सचिव / अपर मुख्य सचिव यांच्यासह सर्व संबंधित अधिकाऱ्यांच्या डिजिटल स्वाक्षरी (Digital Signature/E Signature) वापरूनच तयार करून सादर कराव्यात.

(५) नोंदणी शाखेकडे आलेले भौतिक स्वरूपातील टपाल संबंधित कार्यासनाकडे पाठविण्याचे पूर्णपणे बंद करावे. सदरचे टपाल केवळ ई-ऑफीसद्वारेच पाठविण्यात यावे.

(६) नोंदणी शाखेकडे आलेले भौतिक स्वरूपातील टपाल संबंधित कार्यासनाकडे पाठविण्याचे पूर्णपणे बंद करावे. सदरचे टपाल केवळ ई-ऑफीसद्वारेच पाठविण्यात यावे.

(७) विभागाच्या अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव यांच्या कार्यालयात तसेच संबंधित सर्व सह सचिव/उप सचिव यांचेकडे येणारे टपाल कोणत्याही परिस्थितीत भौतिक स्वरूपात स्वीकारू नये. संबंधितांनी अशा प्रकारचे भौतिक टपाल स्वीकारण्यास विनंती केल्यास त्यांना सदरचे टपाल मध्यवर्ती टपाल केंद्रात जमा करण्याबाबत सूचना देण्यात याव्यात.

(८) ई-ऑफीस प्रणालीची निकड विचारात घेऊन राज्य शासनाकडून "महाराष्ट्र कार्यालयीन कार्यपद्धती नियमपुस्तिका, १९६३" मध्ये सुधारणा करण्यात येऊन "महाराष्ट्र कार्यालयीन कार्यपद्धती नियमपुस्तिका, २०२३" तयार करण्यात आलेली आहे. सदर नियमपुस्तिकेचे अवलोकन केले असता शासकीय कामकाज ई-ऑफीस च्या माध्यमातूनच करणे आवश्यक असल्याचे नमूद केले आहे. त्यामुळे सदर नियमपुस्तिकेचे अवलोकन करून शासकीय कामकाज ई-ऑफीस च्या माध्यमातूनच करावे.

(९) उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभागातील सर्व प्रभागांच्या अधिनस्त सर्व क्षेत्रीय कार्यालयांना देखील ई-ऑफीस प्रणालीचा वापर करणे बंधनकारक करण्यात येत आहे. कोणत्याही परिस्थितीत भौतिक स्वरूपात टपाल पाठविले जाणार नाही,याची दक्षता सर्व क्षेत्रीय कार्यालयांनी घ्यावी.

(१०) सदर सूचनांचे काटेकोरपणे पालन करण्यात येईल, याची दक्षता घेण्यात यावी.

(११) सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा सांकेताक क्रमांक २०२५०५२९११०२५५१८१० आहे.सदर शासन परिपत्रक डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने ,

Digitally signed by IDZES ANGMO KUNDAN
Date: 2025.05.29 11:05:45 +05'30'

**(आय. ए. कुंदन)**
**प्रधान सचिव(कामगार व प्रशासन),महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव (खनिकर्म)/अपर मुख्य सचिव (ऊर्जा)/सचिव (उद्योग),मंत्रालय,मुंबई-३२

२. प्रधान सचिव (कामगार व प्रशासन) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई-३२.

३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालयासमोर, मुंबई

४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळ, उद्योग सारथी, महाकालीगुंफा मार्ग, अंधेरी (पूर्व), मुंबई-९३.
५. विकास आयुक्त (असंघटीत कामगार), कामगार भवन, भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ, बांद्रा-कुर्ला संकुल, सिटी पार्क जवळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र लघुउद्योग विकास महामंडळ, कृपानिधी, ९, वालचंद हिराचंद मार्ग, बेलार्ड इस्टेट, मुंबई १.
७. कामगार आयुक्त, कामगार भवन, भूखंड क्र.सी-२०, ब्लॉक-इ. बांद्रा-कुर्ला संकुल, सिटी पार्क जवळ, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१
८. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत सूत्रधारी कं. लि., हॉगकॉग बिल्डिंग, ४ था मजला, एम.जी. रोड, फोर्ट, मुंबई-२३.
९. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कं. लि. प्रकाशगड, वांद्रे (पू), मुंबई-५१.
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत पारेषण कं. लि. प्रकाशगड, वांद्रे (पू), मुंबई-५१.
११. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कं. लि. प्रकाशगड, १ला मजला, प्लॉट न.सी-१९, ई-ब्लॉक, बांद्रा कुर्ला कॉम्प्लेक्स, वांद्रे (५). मुंबई-५१.
१२. महासंचालक, महाराष्ट्र ऊर्जा विकास अभिकरण, म्हाडा कमर्शियल कॉम्प्लेक्स, स.न.१९१-ए. फेज-८ त्रिदलनगर समोर, येरवडा, पुणे-६.
१३. सचिव, महाराष्ट्र राज्य विद्युत नियामक आयोग, वर्ल्ड ट्रेड सेंटर, सेंटर नं.१, १३ वा मजला, कुलाबा, मुंबई-४००००५
१४. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य खादी व ग्रामोद्योग मंडळ, १९/२१, मनोहरदास स्ट्रीट, फोर्ट, मुंबई-४००००१
१५. संचालक, कै. नारायण मेघाजी लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, दादाभाई चमारबागवाला मार्ग, परेल, मुंबई- ४०००१२.
१६. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, २७, खनिज भवन, सिमेंट रोड, शिवाजीनगर, नागपूर-४४००१०
१७. मुख्य विद्युत निरीक्षक, मुंबई यांचे कार्यालय, प्रशासकीय इमारत, तिसरा मजला, रामकृष्ण चेंबुरकर मार्ग, चेंबूर (पूर्व), मुंबई-७१.
१८. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ५ वा मजला, ब्लॉक-ई, भूखंड क्र.सी-२०, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१
१९. संचालक, बाष्पके, महाराष्ट्र राज्य यांचे कार्यालय, कामगार भवन, सातवा मजला, भूखंड क्र.सी-ब्लॉक-इ. बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई- ४०००५१.
२०. प्रबंधक, औद्योगिक न्यायालय, प्रशासकीय इमारत, पहिला मजला, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१
२१. कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, हुतात्मा बाबु गेनू मुंबई गिरणी कामगार क्रिडा भवन, सेनापती बापट मार्ग, एलफिन्स्टन, मुंबई-४०००१३.
२२. सचिव तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र इमारत व इतर बांधकाम कामगार कल्याणकारी मंडळ, एम.एम.टी.सी. हाऊस, पाचवा मजला, ई ब्लॉक, सी-२२. बांद्रा कुर्ला संकुल, बांद्रा (पूर्व), मुंबई-४०००५१.
२३. संचालक, शासकीय मुद्रण, लेखनसामग्री व प्रकाशन संचालनालय, चर्नीरोड स्टेशन जवळ, नेताजी सुभाष मार्ग, मुंबई-४०० ००४

२४. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वित्तीय महामंडळ, युनायटेड इंडिया इमारत, पहिला माळा, सर फिरोजशहा मेहता रोड, फोर्ट, मुंबई- ४००००१
२५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र पेट्रोकेमिकल्स महामंडळ मर्यादित, ए-१०१, जुईनगर रेल्वे स्टेशन कॉम्प्लेक्स, पहिला माळा, सेक्टर-११, सानपाडा, डी मार्ट जवळ, नवी मुंबई-४००७०५
२६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ, प्लॉट नं.७, अजनी चौक, वर्धा रोड, नागपूर-४४००१५
२७. व्यवस्थापकीय संचालक, कोकण विकास महामंडळ मर्यादित, युनिट क्र. १६, आरे दुग्ध वसाहत, गोरेगांव (पूर्व), मुंबई- ४०००६५
२८. व्यवस्थापकीय संचालक, पश्चिम महाराष्ट्र विकास महामंडळ मर्यादित, दुसरा मजला, कुबेरा चेंबर्स, डॉ. राजेद्र प्रसाद पथ, संचेती हॉस्पीटल समोर, शिवाजीनगर, पुणे-५.
२९. व्यवस्थापकीय संचालक, मराठवाडा महाराष्ट्र विकास महामंडळ मर्यादित, विकास भवन, डॉ. राजेंद्र प्रसाद मार्ग, औरंगाबाद-१.
३०. व्यवस्थापकीय संचालक, विदर्भ महाराष्ट्र विकास महामंडळ मर्यादित, महाजन बिल्डिंग, मेन रोड, सिताबडी, नागपूर-४४००१२
३१. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र इलेक्ट्रॉनिकी महामंडळ मर्यादित, प्लॉट नं. एएम-३. एमआयडीसी.. क्रॉस रोड-ए. मरोल इंडस्ट्रीयल एरिया, अंधेरी (पू), मुंबई- ४०००९३.
३२. सर्व सह / उप सचिव (उद्योग / ऊर्जा / कामगार / खनिकर्म), यांचे स्वीय सहायक, उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३३. सर्व अवर सचिव/कक्ष अधिकारी,उद्योग,ऊर्जा,कामगार व खनिकर्म विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
३४. निवडनस्ती (कार्या-प्रशासन-२)